परिविक्षाधीन सहायक जिल्हाधिकारी (भा. प्र. से.) यांच्याकरीता १ अधिसंख्य पदे निर्माण करणेबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय, क्रमांक :पदनि-२०२०/प्र.क्र. १८/ई-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक - २० ऑक्टोबर, २०२०.

संदर्भ :-

१) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक पदनि-२०१६/प्र.क्र. ७/१६/वित्तीय सुधारणा-१, दि. २०/०२/२०१६
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक पदनि-२०२०/प्र.क्र. १८/ई-८ दि.२१/०४/२०२०
३) सामान्य प्रशासन विभागाचे पत्र क्र. टीआरएन - १०२०/प्र.क्र. ६४/२०२०/दहा, दि. ०६/१०/२०२०

**शासन निर्णय :-**

सन २०१९ च्या तुकडीतील परिविक्षाधीन भारतीय प्रशासन सेवेतील ९ अधिकारी त्यांचे पुढील जिल्हा प्रशिक्षण संदर्भ क्र. २ अन्वये त्यांना वाटप करण्यात आलेल्या जिल्ह्यात घेत आहे. कार्मिक प्रशिक्षण विभागाच्या दि.१४.०९.२०२० रोजीच्या अधिसूचनेद्वारे श्रीमती आयुषी सिंह,परिविक्षाधिन भाप्रसे (TN:२०१९) यांची तामिळनाडू संवर्गातून महाराष्ट्र संवर्गात बदलीने नियुक्ती करण्यात आली आहे. श्रीमती आयुषी सिंह, परिविक्षाधीन भाप्रसे यांची जिल्हा प्रशिक्षणासाठी अधिसंख्य सहायक जिल्हाधिकारी म्हणून त्यांच्या नावासमोर नमूद केलेल्या जिल्ह्यात पदस्थापना करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. त्यानुषंगाने श्रीमती आयुषी सिंह, परिविक्षाधीन भाप्रसे यांना त्यांच्या नावासमोर नमूद जिल्हाधिकारी कार्यालयाच्या आस्थापनेवर नमूद कालावधीसाठी सहायक जिल्हाधिकारी संवर्गात अधिसंख्य सहायक जिल्हाधिकारी पद निर्माण करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

| अ. क्र. | भारतीय प्रशासन सेवेतील परिविक्षाधीन अधिकाऱ्याचे नाव | जिल्हा प्रशिक्षणासाठी प्रस्तावित जिल्हा | परिविक्षाधीन कालावधी | |
|---|---|---|---|---|
| | | | पासून | पर्यंत |
| १ | श्रीमती आयुषी सिंह | सांगली | ०५.१०.२०२० | २५.०८.२०२१ |

२. शासनाने वेळोवेळी काढलेल्या आदेशानुसार उपरोक्त अधिसंख्य सहाय्यक जिल्हाधिकारी यांना महागाई भत्ता व इतर भत्ते अनुज्ञेय राहतील.

३. सदर अधिसंख्य सहाय्यक जिल्हाधिकारी यांच्या पदावरील होणारा खर्च, " मागणी क्र. सी-१-२०५३- जिल्हा प्रशासन (००) ०९३ जिल्हा आस्थापना, (०१) सर्वसाधारण आस्थापना, (०१)(०३) आयुक्त पुणे (२०५३ ००६४), बाब क्र. ०१ वेतन " या लेखाशीर्षाखालील खर्ची टाकण्यात येवून मंजूर अर्थसंकल्पीय अनुदानातून भागविण्यात यावा.

४. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. पदनि-२०१६/प्र.क्र. ७/१६/वित्तीय सुधारणा-१, दि. २०/०२/२०१६ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार उक्त शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२०१०२०१५०९२३२११९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

AJIT SOPANRAO DESHMUKH

Digitally signed by AJIT SOPANRAO DESHMUKH
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=3d2bd4ed83b4c722151f75f40dad09e69527159e04d26476bbf5363e7b1c3cb2, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=704cb545c50221b15cde7ccb8854e694c765dfb3a0240e891ebfb56ee79e3440, ou=REVENUE, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=AJIT SOPANRAO DESHMUKH
Date: 2020.10.20 15:11:29 +05'30'

**(अजित देशमुख)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. विभागीय आयुक्त, पुणे.
२. जिल्हाधिकारी, सांगली.
३. जिल्हा कोषागार अधिकारी, सांगली
४. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१/२, मुंबई / नागपूर.
५. उप सचिव, कार्यासन १०, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
६. उप सचिव, वित्तीय सुधारणा-१, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
७. सह सचिव, कार्यासन ब-१ व ई-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८. निवड नस्ती, कार्यासन ई-८, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.